शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना मंजूर केलेल्या विविध अग्रीमांच्या संदर्भातील कसुरदारांविरुध्द करावयाची कार्यवाही.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक अग्रीम-1095/प्र.क्र. 70/95/विनियम,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 26 सप्टेंबर 1997.

**प्रस्तावना :-**

शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, काही शासकीय अधिकारी/कर्मचारी त्यांना मिळालेल्या विविध अग्रीमांचा विनियोग ज्या कारणाकरिता अग्रीम घेतले आहे, त्याकरिता करीत नाहीत. अग्रीम मिळविण्यासाठी गैरमार्गाचा अवलंब करतात, तसेच अग्रीम व व्याज परतफेडीच्या संदर्भात ज्या काही अटी व शर्ती घालून देण्यात आलेल्या आहेत त्यांचे पालन करीत नाहीत. अशा प्रकरणांत दंडनीय व्याज आकारुन संपूर्ण अग्रीमाची रक्कम एका हप्त्यात व्याज व मुद्दलाची रक्कम वसूल करणे शक्य होत नाही. यातून मार्ग काढण्याकरिता शासनाने पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्याचा निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :--**

शासनाकडून प्राप्त झालेल्या अग्रीम व व्याज परतफेडीमध्ये कोणत्याही प्रकारची कसूर झाल्यास खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी :--

(1) मुंबई वित्तीय नियम, 1959, परिशिष्ट 26 मधील नियम क्रमांक 14(जी) व वित्त विभागाच्या दिनांक 6 नोव्हेंबर 1990 च्या शासन निर्णयानुसार कसुरदारांकडून अग्रीमाची रक्कम दंडनीय व्याजासहित एकरकमी वसूल करण्यात यावी.

(2) अग्रीमासाठी जो प्रचलित व्याजदर आहे त्यापेक्षा रुपये 2.75 प्रतिशत जास्त दराने दंडनीय व्याज आकारण्यात यावे.

(3) वरीलप्रमाणे अग्रीम व त्यावरील दंडनीय व्याजाची वसुली होऊ शकली नाही तर कसुरदारांच्या मालमत्तेतून महसुली थकबाकी वसूल करण्यासाठी जी कार्यपध्दती अवलंबिली जाते त्यानुसार अग्रीम व त्यावरील दंडनीय व्याजाची वसुली करण्यात यावी किंवा या संदर्भातील विहित कायद्यानुसार वसुली करण्यात यावी.

(4) वरील (3) प्रमाणे कार्यवाही करतेवेळीच कसुरदार कर्मचा-यांच्या एकूण वित्तलब्धीतून अग्रीमाची व दंडनीय व्याजाची रक्कम अशा प्रकारे वसूल करण्यात यावी की, वेतन देयकावरील नियमित वसुली व अग्रीम किंवा दंडनीय व्याजाची रक्कम मिळून होणारी वसुली एकूण वित्तलब्धीच्या 50 टक्क्यांपेक्षा जास्त होणार नाही.

(5) वरीलप्रमाणे अग्रीमाची अथवा दंडनीय व्याजाची वसुली होऊ शकली नाही तर अग्रीमासाठी जामीन राहिलेले जेवढे जामीनदार असतील त्यांच्या वेतनातून समप्रमाणात व अग्रीम मंजुरीच्या आदेशात ठरवून दिलेल्या हप्त्याच्या रकमेइतकी रक्कम दरमहा याप्रमाणे एकूण अग्रीम व दंडनीय व्याजाची वसुली करण्यात यावी.

(6) खोटे प्रतिज्ञापत्र, खोटी सही, खोटा करारनामा इत्यादी सादर करुन शासनाची फसवणूक करण्यात आली आहे, असे आढळून आल्यास, संबंधित कर्मचा--याचे विरुध्द मुंबई वित्तीय नियम, 1959, परिशिष्ट 26 मधील नियम 11 नुसार विभागीय चौकशी करण्यात यावी. तसेच, आवश्यकता वाटल्यास फौजदारी गुन्हा दाखल करण्यात यावा.

(कृ.मा.प.

शामगु-रोटा-विवि-एच--1027(12500+10-10-97)

मुंबई वित्तीय नियम, 1959 मधील अग्रीमविषयक संबंधित नियमांमध्ये औपचारिक सुधारणा यथावकाश करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

मीना अ. जोशी,
शासनाच्या अवर सचिव.

प्रति

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-1, महाराष्ट्र, मुंबई 400 020,
महालेखापाल (लेखा परीक्षा)--1, महाराष्ट्र, मुंबई 400 020,
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)--2, महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (लेखा परीक्षा)--2, महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे प्रधान सचिव,
उप मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई,
* प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मादाम कामा रोड, मुंबई,
उप संचालक, लेखा व कोषागारे, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ), स्थानिक निधी लेखा, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सर्व उप कोषागार अधिकारी,
मंत्रालयाच्या सर्व प्रशासकीय विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक कार्यालय प्रमुख आणि कार्यालय प्रमुख,
मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांच्या अर्थ विभागातील मुख्य लेखा व वित्त अधिकारी,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली 110 001,
निवड नस्ती, विनियम, वित्त विभाग.

------

*पत्राने.